**पदस्थापना**
**उप विभागीय अभियंता (स्थापत्य)**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पुन:स्था-२०२५/प्र.क्र.६२/सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १६/०५/२०२५

**वाचा -** शासन आदेश, सा.बां.विभाग, क्र. लाप्रवि-२०२४/प्र.क्र.४०/सेवा-६(क),दि.१६/०५/२०२५

**शासन आदेश**

संदर्भाधीन शासन आदेशान्वये श्री. जितेंद्र राजाराम खलिपे, उप विभागीय अभियंता (निलंबित) यांचे निलंबन संपुष्टात आणून त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात आले आहे. प्रस्तुत शासन आदेशान्वये श्री. जितेंद्र राजाराम खलिपे, उप विभागीय अभियंता यांची पदस्थापना **सहायक अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय महामार्ग मंडळ, छत्रपती संभाजीनगर या श्रीम.अपर्णा कदम यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर** करण्यात येत आहे.

**२.** श्री. जितेंद्र राजाराम खलिपे, उप विभागीय अभियंता यांच्या पदस्थापनेबाबतचे सदरहू आदेश, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होण्याऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**३.** संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. जितेंद्र राजाराम खलिपे, उप विभागीय अभियंता यांना नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू करून घ्यावे.

**४.** श्री. जितेंद्र राजाराम खलिपे, उप विभागीय अभियंता यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा. श्री.खलिपे यांनी म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, पदस्थापनेच्या पदावर रुजू होणे आवश्यक राहील. अन्यथा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९, मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यानी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

**५.** संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. खलिपे, उप विभागीय अभियंता यांचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहित कालावधीत संबंधीत अधिकारी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरीत अवगत करण्यात यावे, जेणेकरून संबंधीतांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरीत करणे शक्य होईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०५१६१८०१५८९३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2025.05.16 18:05:20 +05'30'

**( द .व. खारके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर
३. संबंधीत अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ.
४. संबंधीत कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
५. अधिदान व लेखाधिकारी, निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. मा. मंत्री (सा.बां.)(सा.उ.वगळून)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. मंत्री (सा.बां.)(सा.उ.)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. राज्यमंत्री (सा.बां.)(सा.उ.वगळून)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मा. राज्यमंत्री (सा.बां.)(सा.उ.)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. अ.मु.स.(सा.बां.वि.)/सचिव(रस्ते)/सचिव(बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सा.बां.वि.मंत्रालय, मुंबई.
१२. संबंधीत अधिकारी (ई-मेल द्वारे).
१३. कार्यासन सेवा-६(क), सा.बां.वि., मंत्रालय, मुंबई
१४. कार्यासन सेवा-२, संग्रहार्थ